सन २०१५-२०१६ करिता ताडी धोरण निर्धारित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टीओडी-०६१५/प्र.क्र.११६/राउशु-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
तारीख: २५ ऑगस्ट, २०१५.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र ताडी दुकाने (लिलाव-नि-निविदा पध्दतीद्वारे अनुज्ञप्ती देणे) आदेश, २००१ नुसार ताडी दुकाने लिलाव व निविदा पध्दतीने वितरीत करण्याची पध्दती विहित करण्यात आली आहे. तथापि सन २००९-१० मध्ये सदर धोरणाचा पुनर्विचार होवून श्री.ए.के. जैन, तत्कालीन प्रधान सचिव यांच्या अध्यक्षतेखाली नेमण्यात आलेल्या ताडी धोरण निर्धारण समितीच्या शिफारशीनुसार सन २००९-१० करिता लिलाव-नि-निविदा पध्दतीद्वारे अनुज्ञप्ती प्रदान करण्यात आली होती व तदनंतर पुढील ४ वर्षात सन २०१०-११ ते सन २०१३-१४ पर्यंत दरवर्षी अनुज्ञप्ती शुल्कात ६% वाढ करून अनुज्ञप्तीचे नुतनीकरण करण्यात आले होते.

२. सन २०१३-१४ हे नुतनीकरणाचे अखेरचे वर्ष असल्याने सन २०१४-१५ करिता नव्याने लिलाव-नि-निविदा प्रक्रियेद्वारे ताडी अनुज्ञप्ती प्रदान करण्यात आल्या आहेत. राज्यातील ताडी व्यावसायिकांच्या असलेल्या अडी-अडचणी विचारात घेता तसेच अनुज्ञप्तीच्या आधारे दुकान चालविणाऱ्यांना स्थैर्य प्राप्त व्हावे व या उद्योगात असलेले कामगार त्यांच्या नियमित रोजगारापासून वंचित राहू नयेत म्हणून पुढील वर्ष सन २०१५-१६ करिता ताडी अनुज्ञप्ती नुतनीकरण पध्दतीने मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

राज्यात ताडी अनुज्ञप्ती धोरण ठरविण्याबाबत शासनाने नेमलेल्या श्री.ए.के.जैन समितीच्या शिफारशींनुसार सन २०१०-११ पासून सन २०१३-१४ पर्यंत प्रतिवर्षी ६ टक्के वाढ करून अनुज्ञप्तींचे नुतनीकरण करण्यात आले होते. तदनंतर सन २०१४-१५ या वर्षाकरिता राज्यातील ताडी दुकाने लिलाव-नि-निविदा प्रक्रियेद्वारे देण्यात आली. तथापि राज्यातील ताडी व्यावसायिकांच्या असलेल्या अडी-अडचणी विचारात घेता तसेच अनुज्ञप्तीच्या आधारे दुकान चालविणाऱ्यांना स्थैर्य प्राप्त व्हावे व या उद्योगात असलेले कामगार त्यांच्या नियमित रोजगारापासून वंचित राहू नयेत म्हणून श्री.ए.के. जैन समितीच्या शिफारशींच्या आधारे सन २०१५-२०१६ या एका वर्षाकरिता जे अनुज्ञप्तीधारक सन २०१४-१५ मध्ये टीडी-१ अनुज्ञप्ती धारण करीत आहेत त्यांनी

त्यांच्या सर्वोच्च यशस्वी बोलीवर १० % वाढ करुन अनुज्ञप्ती शुल्क भरल्यास त्यांची अनुज्ञप्ती नमुना टीडी-१ चे नुतनीकरण करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२५१७१५३२०८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ankush S Gharge

Digitally signed by Ankush S Gharge
DN: CN = Ankush S Gharge, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Joint Secretary
Date: 2015.08.25 17:46:51 +05'30'

**(अं. शा. घार्गे)**
सह सचिव, गृह विभाग.

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
२. मा.मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
३. मा.राज्यमंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
४. प्रधान सचिव (राउशु), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, गो.ते. रुग्णालय, मुंबई,
५. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,
६. सर्व जिल्हाधिकारी,
७. सर्व विभागीय उपआयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
८. सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
९. निवड नस्ती.